गोरेवाडा, जिल्हा नागपूर येथे आंतरराष्ट्रीय प्राणीसंग्रहालयाची स्थापना करणे ....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१४/प्र.क्र.१०७/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख :- १३ फेब्रुवारी, २०१५.

वाचा :-

१. शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी-१००९/प्र.क्र.११९/फ-१, दिनांक २९.११.२०११ रोजीचे दोन शासन निर्णय.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक : अंदाज-२०१४/ प्र.क्र.११०/ अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.
३. शासन निर्णय क्रमांक:- डब्ल्युएलपी-०५.१४/ प्र.क्र.१०७/ फ-१, दिनांक:- २१.०८.२०१४.
४. फॉरेस्ट डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि., नागपूर यांचे क्र.महाव्य/ जाखाका/ गोरेवाडा/ प्र.क्र.३०/१०२४, दिनांक २२.१०.२०१४ रोजीचे पत्र.
५. फॉरेस्ट डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि., नागपूर यांचे क्र.महाव्य/ जाखाका/ गोरेवाडा/ प्र.क्र.१९(ii)/ ११६९, दिनांक २२.११.२०१४ रोजीचे पत्र.
६. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/ प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.०२.०१.२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक:- डब्ल्युएलपी-०५.१४/ प्र.क्र.१०७/ फ-१, दिनांक:- ३०.०१.२०१५.
८. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/ प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.०९.०२.२०१५.

**प्रस्तावना :-**

नागपूर शहर व परिसरात पर्यटनाला चालना मिळून रोजगारांच्या संधी उपलब्ध होणे तसेच दुर्मिळ व राज्यातील या भागातून विलुप्त झालेल्या प्राण्यांचे प्रजनन करुन त्यांना त्यांच्या नैसर्गिक अधिवासात पुनर्स्थापन करण्याकरीता संदर्भ क्रमांक (१) अन्वये दोन शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुसार गोरेवाडा, नागपूर येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्याचा व गोरेवाडा जंगलाचे व तेथील वन्यप्राण्यांचे संरक्षणासाठी बचाव केंद्र उभारण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

राज्यस्तरीय योजनेतंर्गत सन २०१४-१५ करीता नागपूर जिल्ह्यातील गोरेवाडा येथे प्राणीसंग्रहालयाची प्राथमिक कामे या योजनेकरीता (२४०६-२२५९) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ३५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. वित्त विभागाचे परिपत्रक संदर्भ क्रमांक २ व ६ नुसार संदर्भ क्रमांक ३ व ७ येथील शासन निर्णयान्वये रु. २०९.९६ लक्ष व रु. १०२०.०४ लाख निधी वितरीत करण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यस्तरीय योजनेतंर्गत सन २०१४-१५ करीता नागपूर जिल्ह्यातील गोरेवाडा येथे प्राणीसंग्रहालयाची प्राथमिक कामे या योजनेकरीता (२४०६-२२५९) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ३५०.०० लक्ष व पूरवणी मागणीद्वारे रु. १७००.०० लक्ष असा एकूण रु. २०५०.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. फॉरेस्ट डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लि., नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०१४-१५ करीता नागपूर जिल्ह्यातील गोरेवाडा येथे प्राणीसंग्रहालयाची प्राथमिक कामे या योजनेकरीता (२४०६-२२५९) मधील विहीत प्रयोजनाखाली वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक ८ नुसार अर्थसंकल्पित निधीच्या ७५ % मर्यादेच्या अधीन राहून रुपये १५३७.५० लक्ष निधी वितरीत करणे आवश्यक आहे. तथापि संदर्भ क्रमांक ३ व ७ च्या शासन निर्णयान्वये १२३०.०० लक्ष

निधी वितरीत केला असल्याने उर्वरित रु. ३०७.५० लक्ष (रु. १५३७.५० -१२३०.०० = ३०७.५० ) खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. प्रस्तावीत खर्चः- लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१ वनीकरण (११०) वन्यजीवन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (००)(१२) गोरेवाडा येथील प्रस्तावीत प्राणीसंग्रहालयाची प्राथमिक कामे (राज्य) (२४०६ २२५९) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून आणि सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावा.

२. सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

३. वितरीत केलेला निधी राज्य शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या व संदर्भाधीन शासन निर्णयास अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची जबाबदारी संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/ प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.०९.०२.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१२५३१९३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.13 14:00:34 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

प्रति,

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) व्यवस्थापकीय संचालक, फॉरेस्ट डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लिमिटेड, नागपूर
५) महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (वने), मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) ब-१, फ-२, फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१४/प्र.क्र.१०७ /फ-१, तारीख:- १३.०२.२०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष २४०६-२२५९ | अर्थसंकल्पित निधी | फेब्रुवारी, २०१५ | मार्च, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ | ७ |
| १ | ५३-मोठी बांधकामे | १८१५.५० | ३०७.५० | ०.०० | ३०७.५० |
| २ | ५०- इतर खर्च | २३४.५० | ०.०० | ०.०० | ०.०० |
| एकूण | | २०५०.०० | ३०७.५० | ०.०० | ३०७.५० |

****